**कोषागारातून रोख देय अनुदान**
केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन अंतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुसूचित जाती घटकासाठीचे अनुदान वितरीत करण्याबाबत.....
**(लेखाशीर्ष २२१५ ९८२६)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-१२१४/प्र.क्र.१०७/पापु-१६

जी.टी. रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ०१
तारीख: ३१ मार्च, २०१५

वाचा

१) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः स्वभामि- २०१४/प्र.क्र.८८/ पापु-८, दि.७ नोव्हेंबर, २०१४.**
२) **शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-१२१४/प्र.क्र.१०७/पापु-१६, दि.२० जानेवारी, २०१५.**
३) **शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-१२१४/प्र.क्र.१०७/पापु-१६, दि.२३ मार्च, २०१५.**
४) **केंद्र शासनाचे मंजूरी आदेश : दि.२७.२.२०१५.**

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (पूर्वीचे निर्मल भारत अभियान) केंद्र हिश्श्यासाठी अनुसूचित जाती घटकांतर्गत २२१५ ९८२६ या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये संदर्भाधीन क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीत केलेल्या निधीपैकी रू.२००१.५० लक्ष इतके अनुदान संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आले आहे. केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या केंद्र हिश्श्यासाठी अनुसूचित जाती घटकांतर्गत २२१५ ९८२६ या लेखाशीर्षाखाली, वित्त विभागाने रु.१००८.९१ लक्ष निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय**

स्वच्छ भारत मिशनसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानासाठी जिल्हा परिषदांना अनुसुचित जातीच्या घटकासाठी स्वच्छता कार्यक्रम राबविण्यासाठी निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत रकमेपैकी रू.१००८.९१ लक्ष (दहा कोटी, आठ लाख, एक्याण्णव हजार) इतके अनुदान संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरूपात मुक्त करण्यात येत आहे. सद्यस्थितीत पालघर जिल्हा परिषदेचा निधी, जिल्हा परिषद, ठाणे यांना सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी आहरित करून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांना त्वरीत उपलब्ध करून द्यावा.

२. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्रमांक २- अ आणि २-आ यांची पूर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२ नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम या प्रयोजनार्थ केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सुचनांमधील तरतुदीनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहीत नमुन्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील कार्यासन क्र.पापु-०४, पापु-१६ व पापु-२० ला सादर करावे.

ऊ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

**ऋ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास त्वरीत सादर करावे.**

३. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, २ जलनिस्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, ०२ ग्राम सफाई कार्यक्रम, (०२) (०९) निर्मल भारत अभियान केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (अनुसुचित जाती) (२२१५ ९८२६)" ३१ सहायक अनुदाने, या लेखाशीर्षाखाली घालावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८४/व्यय-३, दि.२५.३.२०१५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१४३३४८५७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.31 12:05:56 +05'30'

**(वि.य.गोखले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल- १/२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
२. विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर .
३. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सर्व.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
५. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई - ४०० ०३२.
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई व नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सीबीडी, बेलापूर, नवी मुंबई.
९. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा. व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
१०.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१२.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, (विघयो) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३.वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सर्व.
१५.कार्यासन क्रमांक पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१६.निवड नस्ती, कार्यासन क्र. पापु-१६.

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र.स्वभामि-१२१४/प्र.क्र.१०७/पापु-१६, दि. ३१ मार्च, २०१५ सोबतचे सहपत्र.

(रू.लक्ष)

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सन २०१४-१५ चा सुधारित आराखडा केंद्र हिश्श्याची मागणी | दि. ३१ मार्च, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ३८४०.९३ | ०.०० |
| २ | रायगड | १५३९.४५ | १२.३२ |
| ३ | रत्नागिरी | २१६५.२४ | २०.६१ |
| ४ | सिंधुदूर्ग | २१४५.०८ | ३१.१९ |
| ५ | पालघर | - | ८.२६ |
| ६ | नाशिक | १७०८.६९ | १२.९६ |
| ७ | धुळे | ९१३.१० | २.८१ |
| ८ | नंदूरबार | १२३४.९८ | ०.०० |
| ९ | जळगाव | १७७०.९७ | २२.२५ |
| १० | अहमदनगर | २०३१.३७ | ९.३६ |
| ११ | पुणे | ३६५८.६८ | ५९.१५ |
| १२ | सातारा | १७२८.९२ | १७.०४ |
| १३ | सांगली | २१७९.५८ | ४७.०६ |
| १४ | सोलापूर | ३४३३.९५ | ५४.९६ |
| १५ | कोल्हापूर | २२२५.३१ | ३८.०० |
| १६ | औरंगाबाद | २०२७.७२ | २९.५४ |
| १७ | जालना | १८५५.६३ | ५६.२४ |
| १८ | परभणी | १७२९.५५ | २५.९७ |
| १९ | हिंगोली | १७२०.१५ | ३४.९१ |
| २० | बीड | २१३४.२४ | ५२.५५ |

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सन २०१४-१५ चा सुधारित आराखडा केंद्र हिश्श्याची मागणी | दि. ३१ मार्च, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|
| २१ | नांदेड | १९०७.४९ | २.७४ |
| २२ | उस्मानाबाद | २२४९.६३ | ४६.९० |
| २३ | लातूर | २४०६.५९ | ३८.०० |
| २४ | बुलढाणा | २२३०.४९ | ३७.०० |
| २५ | अकोला | १८१७.९९ | ३९.७० |
| २६ | वाशिम | १४०५.७४ | २३.६१ |
| २७ | अमरावती | १६४५.५६ | ७४.४५ |
| २८ | यवतमाळ | २५३२.४६ | ४४.३२ |
| २९ | वर्धा | ३९०३.३६ | ५७.९३ |
| ३० | नागपूर | २०७२.४९ | १५.७० |
| ३१ | भंडारा | १७५८.७१ | ३३.५७ |
| ३२ | गोंदिया | १०१२.०५ | १९.०५ |
| ३३ | चंद्रपूर | २०६७.३५ | २३.३७ |
| ३४ | गडचिरोली | ११३१.४५ | १७.३९ |
| **एकूण** | ३४ | **६८१८४.९०** | **१००८.९१** |
| **अक्षरी** | | **सहाशे एक्याऐंशी कोटी, चौऱ्याऐंशी लक्ष, नव्वद हजार फक्त** | **दहा कोटी, आठ लक्ष, एक्याण्णव हजार फक्त** |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.31 12:06:59 +05'30'

**(वि.य.गोखले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**